डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजनेकरिता निधी आंहरित व वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: तंशिपु-३३१९/(प्र.क्र.१६६/१९)/तांशि-३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक:१३ फेब्रुवारी, २०२०.**

**वाचा: -**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६
२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.४०७/तांशि-४, दि.२२ फेब्रुवारी, २०१८
३) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१८५/तांशि-४, दि.१८ जून, २०१८
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०१९.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र३-अर्थ/११५.क्र.प्र/२०१९-पूरक., दिजानेवारी ०३., २०२०
७) संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र.१८/तंशिसं/डॉ.पं.दे.वनिभ/ख.प्र.मा/२०१९/०९, दि.१० जानेवारी, २०२०

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन दि.१३ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्धारीत केलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमांना शासकीय, शासन अनुदानित व विना अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये/ तंत्रनिकेतनांमध्ये प्रवेश घेणाऱ्या आर्थिकदृष्ट्या मागास प्रवर्गातील ज्या विद्यार्थ्यांचे पालक अल्पभूधारक शेतकरी आहेत किंवा ज्यांचे पालक नोंदणीकृत मजूर आहेत अशा विद्यार्थ्यांसाठी राज्यातील महानगरांतील (मुंबई, पुणे प्रादेशिक विकास प्राधिकरण क्षेत्रातील सर्व शहरे, औरंगाबाद, नागपूर) प्रवेशित आहेत, त्या विद्यार्थ्यांसाठी प्रती विद्यार्थी प्रतीमाह रु.३०००/- व अन्य ठिकाणी असलेल्या वसतिगृहांमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांसाठी प्रती विद्यार्थी प्रतीमाह रु.२०००/- या प्रमाणे डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना या योजनेंतर्गत वसतिगृह निर्वाह भत्ता देण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

तसेच संदर्भाधीन दि.१८ जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून ज्या विद्यार्थ्यांच्या कुटुंबाचे (दोन्ही पालकाचे एकत्रित) वार्षिक उत्पन्न रु.८.०० लक्ष पर्यंत आहे, अशा विद्यार्थ्यांना या योजनेंतर्गत महानगरासाठी (मुंबई व पुणे महानगर प्रादेशिक विकास प्राधिकरण क्षेत्रातील सर्व शहरे, औरंगाबाद/नागपूर इ.) व इतर शहरे/ग्रामीण भागासाठी प्रतिवर्षी अनुक्रमे रु.१०,०००/- व रु.८,०००/- इतका निर्वाह भत्ता अनुज्ञेय आहे.

"डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना" या योजनेसाठी सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षामध्ये मूळ मंजूर रु.७०.०० कोटी तरतूदीच्या ६०% प्रमाणे रु.४२.०० कोटी व जून-२०१९ च्या पावसाळी अधिवेशनात पूरक मागणीव्दारे अर्थसंकल्पित संपूर्ण निधी रु.५०.०० कोटी (वित्त विभागाच्या सहमतीने) असा एकूण रु.९२.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन दि.१० जानेवारी, २०२० अन्वये सदर योजनेंतर्गत चालू शैक्षणिक वर्षात पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्त्याची रक्कम अदा करण्यासाठी विधीमंडळाच्या डिसेंबर-२०१९ च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीव्दारे मंजूर झालेला रु.३०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यासाठी प्रस्ताव सादर केला आहे. त्यास अनुसरुन सदर योजनेसाठी रु.३०.०० कोटी इतक्या निधीच्या ८० टक्केच्या मर्यादेत रु.२४.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन**:-

डॉ. पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना या योजनेकरीता विधीमंडळाच्या डिसेंबर-२०१९ च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीव्दारे मंजूर झालेल्या रु.२४.०० कोटी इतका निधी (अक्षरी रुपये चोवीस कोटी फक्त) शैक्षणिक वर्ष २०१९-२० मधील पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्त्याची रक्कम अदा करण्याकरीता संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांना "खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून" आंहरित व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असुन, त्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| महिना/अधिवेशन | मंजूर निधी | वितरीत केलेला निधी | झालेला खर्च | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| मार्च-२०१९ | ७०.०० | ४२.०० | ४२.०० | ०.०० |
| जून-२०१९ | ५०.०० | ५०.०० | २५.०४ | ०.०० |
| डिसेंबर-२०१९ | ३०.०० | ०.०० | ०.०० | २४.०० |
| **एकूण** | **१५०.००** | **९२.००** | **६७.०४** | **२४.००** |

२. **अटी व शर्ती:-**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६ व या योजनेसंदर्भातील त्यानंतरच्या दि.७ ऑक्टोबर, २०१७, दि.२२ फेब्रुवारी, २०१८, दि.१८ जून, २०१८ व इतर आदेशामध्ये नमूद अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२) उपलब्ध तरतूद महाडिबीटी पोर्टलवरुन पात्र विद्यार्थ्यांना विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत करण्यात यावी.

३) संचालक, तंत्रशिक्षण व सर्व विभागीय तंत्रशिक्षण सहसंचालकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील नमुन्यादाखल काही संस्थाना भेट देऊन या योजनेची अंमलबजावणी व्यवस्थितरीत्या होत असल्याची वेळोवेळी तपासणी करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४) यापूर्वीच्या तपासणी अहवालात काही त्रुटी/अनियमितता आढळून आली असल्यास ती तात्काळ दूर करण्यासाठी आवश्यक ती उपयायोजना संचालक, तंत्रशिक्षण यांनी करावी.
५) चूकीची अथवा खोटी माहिती भरुन शासनाकडून निर्वाह भत्ता प्राप्त करुन घेंतले असल्याचे निदर्शनास आले असल्यास अशी रक्कम वसूल करुन ती शासन जमा करण्यात यावी.
६) या शासन ज्ञापनाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत निधीचे तात्काळ वाटप करावे व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. निधीचे वाटप करण्यास विलंब करु नये. याबाबतची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण व सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण यांची राहील.

४. सदर योजनेकरीता होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष "२२०३-तंत्रशिक्षण, मागणी क्र.डब्ल्यू-३, तंत्रशिक्षण १०७, शिष्यवृत्ती (००) (००)(०९) डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना, (कार्यक्रम) (२२०३ ३५४२) ३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२०/१४७१, दि.२१ जानेवारी, २०२० अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८८/२०२०/व्यय-५, दि.२८ जानेवारी, २०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा सांकेतांक २०२००२१३१६०२२०७८०८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a393e9553ec410a2133a89ca969ca76abd4ca892102ef711a7fff2d0c54599c7, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c63b0a0419f0eb37099daca08e4cccce3bf49154bf43e8881e68ac2ca3a46392, ou=HIGHER AND TECH, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2020.02.14 13:02:07 +05'30'

**( मनाली मि.सामंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सर्व विभागीय तंत्रशिक्षण सह संचालक. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
७) नियोजन विभाग/वित्त विभाग, व्यय-५/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव/तांशि-४, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी/साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती/तांशि-३.